**जल जीवन मिशन कार्यक्रमांतर्गत आदिवासी घटक कार्यक्रमाचा राज्य हिश्श्याचा निधी राज्य पाणी व स्वच्छता मिशनला वितरित करण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः जेजेएम-२०२०/प्र.क्र.९५/पापु १०**
सातवा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल,
क्रॉफर्ड मार्केट जवळ, लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई
तारीख: १९ नोव्हेंबर,२०२०

**वाचा:-**

**१) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्र.जजमि २०२०/प्र.क्र.१३८/ पापु १० (०७), दि.०४.०९.२०२०**

**२) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्र.जेजेएम २०२०/ प्र.क्र.९६/ पापु ०७, दि.१५.०९.२०२०**

**३) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग क्र.बीयुडी-२०२०/ प्र.क्र.१०/ का-६, दि.०५.११.२०२०**

**प्रस्तावना-**

केंद्र शासनाने राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमाची पुनर्रचना करुन नवीन जल जीवन मिशनची सुरवात केली आहे. केंद्र शासनाने जल जीवन मिशनचे दि.२५.१२.२०१९ रोजी प्रसिध्द केलेल्या मार्गदर्शक सूचनांनुसार राज्यात जल जीवन मिशन राबविण्याकरीता सविस्तर मार्गदर्शक सूचना वाचा क्र.१ च्या शासन निर्णयान्वये निर्गमित करण्यात आल्या आहेत. जल जीवन मिशन अंतर्गत आदिवासी घटक कार्यक्रमामध्ये ग्रामीण आदिवासी लाभार्थ्यांना पेयजल पुरवठा करण्यात येतो. जल जीवन मिशन कार्यक्रमांतर्गत वित्तीय वर्ष २०२०-२०२१ करीता यापूर्वी आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत केंद्र हिश्श्यापोटी रु.१४.०० कोटी इतका निधी जल जीवन मिशनकरीता कार्यान्वित सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन प्रणालीच्या (PFMS) राज्य नोडल खात्यामध्ये संदर्भिय क्र.२ च्या शासन निर्णयान्वये जमा करण्यात आले आहेत. आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत राज्य हिश्श्यापोटी अर्थसंकल्पित केलेल्या रु.५०.०० कोटी निधीपैकी रु.७.५ कोटी (१५%) इतका निधी वित्त विभागाने लेखाशीर्ष (२२१५ ए०६१) खाली आदिवासी विकास विभागास अर्थसंकल्पिय अंदाज,वितरण व संनियंत्रण प्रणालीवर (BEAMS) उपलब्ध करुन दिला आहे. सदर निधी आदिवासी विकास विभागाने या विभागास संदर्भिय क्र.३ च्या शासन निर्णयान्वये वितरित केला आहे.

जल जीवन मिशन या केंद्र सहाय्यीत योजनेअंतर्गत सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन प्रणाली कार्यान्वित करण्याकरीता राज्य स्तरावर स्टेट बँक ऑफ इंडियामध्ये राज्य नोडल खाते (State Nodal Account) उघडण्यात आले आहे. जल जीवन मिशन अंतर्गत आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत (राज्य हिस्सा) आदिवासी विकास विभागामार्फत प्राप्त उक्त रु.७.५ कोटी (रुपये- सात कोटी पन्नास लक्ष फक्त) इतका निधी राज्य नोडल खात्यात जमा करणे आवश्यक आहे.

## शासन निर्णय-

जल जीवन मिशन या केंद्र पुरस्कृत कार्यक्रमांतर्गत सन २०२०- २०२१ या आर्थिक वर्षामध्ये मागणी क्र. टी-०५, आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत (राज्य हिस्सा), (१) (१०) राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम (राज्य हिस्सा ५० टक्के) (कार्यक्रम) ३१, सहायक अनुदाने (वेतनेत्तर) (२२१५ ए०६१) या लेखाशिर्षाखाली रु.७.५ कोटी (अक्षरी-रुपये सात कोटी पन्नास लक्ष फक्त) इतका निधी तात्काळ जल जीवन मिशन कार्यक्रमांतर्गत सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन प्रणालीकरीता राज्य पाणी व स्वच्छता मिशन (जल जीवन मिशन) या नावाने उघडण्यात आलेल्या एस.बी.आय. बँक, मुख्य शाखा, मुंबई (IFSC Code- SBIN ००००३००) येथील राज्य नोडल खाता क्र.३९२२२५४८२४२ मध्ये जमा करण्यात यावा. निधी जमा झाल्यानंतर पुढील सर्व आवश्यक कार्यवाही मिशन संचालक, जल जीवन मिशन (राज्य पाणी व स्वच्छता मिशन) यांच्याद्वारे करण्यात यावी.

२. मिशन संचालक, जल जीवन मिशन (राज्य पाणी व स्वच्छता मिशन) यांनी उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशीर्षानिहाय/ उपलेखाशीर्षानिहाय साध्य झालेल्या भौतिक उद्दिष्ट्ये, निधी उपयोगिता प्रमाणपत्र इत्यादी माहितीसह या विभागास व आदिवासी विकास विभागास प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवावेत. तसेच संदर्भिय क्र.३च्या शासन निर्णयात नमुद सूचना विचारात घेऊनच निधी वितरित तथा निधी विनियोग करण्यात यावा.

३. सदर रक्कम आहरित करण्यासाठी आहरण व संवितरण अधिकारी अवर सचिव (रोखशाखा) (श्री.पां.रा.खोटरे) यांना व नियंत्रक अधिकारी म्हणून उप सचिव (श्री.रा.म.गेंगजे), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. सदर रक्कम (श्री.पां.रा.खोटरे) आहरण व संवितरण अधिकारी तथा अवर सचिव (रोखशाखा), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांनी एस.बी.आय फोर्ट, मुंबई मुख्य शाखा, मुंबई (IFSC Code- SBIN ००००३००) येथे उघडण्यात आलेल्या राज्य नोडल खाता क्र.३९२२२५४८२४२ मध्ये जमा करावी.

४. प्रस्तुत प्रकरणी वित्त विभागाचे परिपत्रक क्र.अर्थसं २०२०/ प्र.क्र.६४/अर्थ-३, दि.१६.०४.२०२० सोबतच्या परिशिष्ठातील अनुक्रमांक १ ते ८ व क्र.९ मधील तपासणी सूचीतील अ.क्र.1 ते १० मधील अटींची पूर्तता होत असल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे. हा शासन निर्णय वित्त विभागाचे अनौ.संदर्भ क्र.१५३/व्यय-३, दि.०७.०८.२०२० अन्वये प्राप्त सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२०१११९१३३११६७९२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Saroj Rajesh Deshpande

Digitally signed by Saroj Rajesh Deshpande
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply And Sanitation Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=6a31a46110f5bc3d6fc7bdf1d6619a227d04e20859a66b7faddf9190ac096802, cn=Saroj Rajesh Deshpande
Date: 2020.11.19 18:25:04 +05'30'

**(सरोज देशपांडे)**
कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन

प्रति,

१. श्री.रा.म.गेंगजे, उप सचिव, पाणी पुरवठा स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई
२. श्री.पां.रा.खोटरे, अवर सचिव, पाणी पुरवठा स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई

प्रत,

१. मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
२. अपर मुख्य सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहाय्यक
३. महालेखापाल (लेखा परीक्षा/ लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ मुंबई/ २- नागपूर
४. मिशन संचालक, जल जीवन मिशन, बेलापूर, नवी मुंबई
५. उप सचिव (का-६), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
७. मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, मुंबई
८. कार्यासन पापु-०४/२०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई
९. निवडनस्ती (पापु ०७)